**सिंधूदुर्ग जिल्हयातील रिसोर्स बेस्ड इंटेन्सीव्ह प्लॅनींग अँड डेव्हलपमेंट या पथदर्शी प्रकल्पांतर्गत हस्तकला व्यवसाय उद्योग समुहाच्या विकासासाठी सन २०१६ -१७ करीता महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळास उपलब्ध करुन दिलेले अनुदान वितरित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१६/प्र.क्र.१५६/उद्योग-६**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक- ३१/३/२०१७

<u>वाचा</u>:- १. शासन निर्णय क्र. संकिर्ण २०१६/प्र.क्र.१५६/उद्योग-६, दि.२१/०९/२०१६.
२. महाव्यवस्थापक, महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळ यांचे क्र. मलउविम/विपनन/२०१६-१७/३५३, दि.०२.११.२०१६ चे पत्र.
३. शासन निर्णय क्र.संकिर्ण २०१६/प्र.क्र.१५६/उद्योग-६, दि.०९.०३.२०१६.
४. महाव्यवस्थापक, महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळ यांचे क्र. मलउविम/हस्तकला/२०१६-१७/३३८, दि. २७.०३.२०१७ चे पत्र.

**शासन निर्णय:-**

" महाराष्ट्र विनियोजन विधेयक, २०१६ यास महाराष्ट्र विधानमंडळाने मंजुरी दिलेली असून महाराष्ट्राचे राज्यपाल यांनी त्यास अधिसंमती दिलेली आहे. या अधिनियमान्वये सन २०१६-१७ या वर्षाकरिता करावयाच्या खर्चास अनुमती देण्यात आलेली आहे. त्यानुसार उद्योग,ऊर्जा व कामगार विभागाने अर्थसंकल्पिय तरतुद संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांना सुर्पुद केली आहे.

२. सन २०१६-२०१७ या वित्तीय वर्षाकरिता १०४ हस्तव्यवसाय उद्योग या उद्दिष्टाखाली रुपये ८,००,००,०००/- (रुपये आठ कोटी फक्त) इतकी तरतुद अर्थसंकल्पित करण्यात आली आहे. तसेच, उपशिर्ष ३१-सहायक अनुदान या शिर्षाखाली रु. १ कोटी निधी अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे. त्यापैकी मार्च, २०१७ अखेर BDS प्रणालीवर रु. ०९ कोटी अनुदान उपलब्ध आहे. या अनुदानापैकी एकुण रु. ७ कोटी २० लक्ष इतके अनुदान महामंडळास वितरीत करण्यात आले आहे. आता उर्वरित रु. १ कोटी ६० लक्ष आणि रु. २० लक्ष असे एकुण मिळून रु. १ कोटी ८० लक्ष इतके अनुदान महामंडळास वितरीत करण्यात येत आहे. सदर अनुदान अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर दर्शविल्याप्रमाणे खर्च करण्यात यावे.

३ यावरील खर्च मागणी क्र. के-७, २८५१ ग्रामोद्योग व लघुद्योग, (००) १०४ हस्तव्यवसाय उद्योग (००) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजना (००) (०२) हस्तव्यवसाय उद्योगाचा विकास (२८५१ ०५६७) ३१, सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर)" या उद्दिष्टांखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व तो त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. सदर रकमेच्या आहरण व संवितरणाचे अधिकार विकास आयुक्त (उद्योग) उद्योग संचालनालय, मुंबई यांच्या कार्यालयातील लेखा अधिकारी यांना देण्यात येत असून उक्त

प्रयोजनाकरिता करण्यात आलेल्या खर्चाचे विनियोग प्रमाणपत्र महामंडळाने विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांच्या कार्यालयातील लेखा अधिकारी यांना सादर करावे. लेख्याच्या खर्चमेळाबाबत महालेखापाल (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई व महालेखापाल, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२ नागपुर यांच्या कार्यालयास विहीत कालावधीत अवगत करावे.

५. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांच्या कार्यालयातील लेखा अधिकारी यांनी उपरोक्त प्रयोजनावर खर्च झालेल्या मासिक निधीची आकडेवारी कार्यासन अधिकारी (प्रशासन-१) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ यांना दर महिन्याच्या १० तारखेपुर्वी सादर करावी.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१७०३३११०१८२२०४१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vaishnav M N

Digitally signed by Vaishnav M N
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Endustries Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c2af1b03cee224a81b9f9c9cd2b1e6abe5e60e2c4801c2c6a3ba14985ec4fb8b, cn=Vaishnav M N
Date: 2017.04.01 16:29:13 +05'30'

**( म.न.वैष्णव )**
कक्ष अधिकारी.

**प्रति:**- माहितीसाठी व आवश्यक त्या उचित कार्यवाहीसाठी अग्रेषित:-

१. विकास आयुक्त (उद्योग),उद्योग संचालनालय, नवीन प्रशासन भवन, मंत्रालयासमोर, मुंबई.
२. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळ, मुंबई.
३. वित्त नियंत्रक, महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळ, मुंबई.
४. लेखाअधिकारी, विकास आयुक्त (उद्योग),उद्योग संचालनालय, नवीन प्रशासन भवन, मंत्रालयासमोर, मुंबइ.
५. महालेखपाल (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई
६. महालेखापाल, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२ नागपुर.
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८. संचालक, लेखा व कोषागारे,फ्री प्रेस जनरल मार्ग, मुंबई.
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१०. कक्ष अधिकारी, वित्त विभाग (अर्थसं-१४ व व्यय-१६), मंत्रालय,मुंबई.
११. कक्ष अधिकारी, (प्रशासन-१)उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय,मुंबई.
१२. निवड नस्ती/उद्योग-६.